**महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोगास सन २०१९-२० या वर्षाकरीता अर्थसंकल्पित करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन ज्ञापन, क्रमांक: सफाई-२०१९/प्र.क्र. १४९ /अजाक**

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक: ०४ नोव्हेंबर, २०१९.

वाचा: शासन ज्ञापन, सम क्रमांक, दिनांक १० जुलै, २०१९

**ज्ञापन :**

महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोगास कळविण्यात येत आहे की, सदर आयोगाकरीता सन २०१९-२० या वर्षातील अर्थसंकल्पित तरतूदीपैकी शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०८ जुलै, २०१९ अन्वये सन २०१९-२० या वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (माहे डिसेंबर,२०१९ अखेर) अर्थसंकल्पित तरतूद एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेली असून सदर तरतूदीपैकी रुपये ५०,००,०००/- (अक्षरी रूपये पन्नास लक्ष फक्त) तरतूद उपरोक्त वाचा अन्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

आता नव्याने उपरोक्त शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर देण्यात आलेली उर्वरीत रुपये ४०,००,०००/- (अक्षरी रूपये चाळीस लक्ष फक्त) तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

(रुपये हजारात)

| अ.क्र. | महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोग | अर्थसंकल्पित निधी/तरतूद रुपये | या ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी/तरतूद रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३१,सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)<br>२२२५ २६३ १ | १५,०००<br>(अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) | ४,०००<br>(अक्षरी रुपये चाळीस लक्ष फक्त) |

२. सदर तरतूद/निधी, या अगोदर वितरीत करण्यात आलेल्या (रुपये ५०,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त) ) अनुदानाचे/तरतूदीचे/निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्यात यावे आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता करण्यात यावी, या अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

३. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील तरतूद/निधी खर्च करावा. सदर तरतूद/निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्यात यावे. यासाठी सह सचिव/उप सचिव (अजाक), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रण अधिकारी राहतील. सदर निधी/तरतूद पुढील कार्यवाहीकरीता प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण, मुंबई विभाग यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. त्यांना सदर निधी/तरतूद महाराष्ट्र कोषागार नियम ४४ मधील नमून्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोग, मुंबई यास संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील नमूद केलेल्या प्रत्येक बाबीची पूर्तता झालेली आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत आयोगावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०१९-२० या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३

२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण

०१, अनुसूचित जातींचे कल्याण

१०२, आर्थिक विकास

(०३) (०३) महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोगास सहाय्यक अनुदान. (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम)

३१,सहायक अनुदाने (वेतनेत्तर)

२२२५ २६३ १

६. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ मधील बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. सदर योजनेचा निधी वितरीत करताना प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण, मुंबई विभाग यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. सदर ज्ञापन शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ०१ एप्रिल व ०८ जुलै,२०१९ नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारांतर्गत आणि विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संकेतांक २०१९११०५१२२५२२०८२२ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sunil D Sardar

Digitally signed by Sunil D Sardar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, cn=Sunil D Sardar
Date: 2019.11.05 12:27:40 +05'30'

**(सुनिल सरदार)**

कार्यासन अधिकरी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. सह सचिव/उप सचिव (अजाक), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई.

२. प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग, नवी मुंबई.
३. प्रशासकिय अधिकारी, महाराष्ट्र राज्य सफाई कर्मचारी आयोग, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई.
६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. उप कोषागार अधिकारी, नवी मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती /अजाक